नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीचा ठराव क्र.५५, दि.२६.१०.२०२० विखंडीत करण्यासाठी, निलंबित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नामपा-२०२१/प्र.क्र.८९/नवि-२४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ जानेवारी, २०२२.

**संदर्भ :-** आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र.जा.क्र.नांवाशमनपा/साप्रवि/आस्था-३/१२१२९/२०२१, दिनांक ०३/०३/२०२१.

**प्रस्तावना : -**

श्री.बालाजी देवराव देसाई, स्वच्छता निरीक्षक, क्षेत्रिय कार्यालय क्र.३, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका अंतर्गत व्यवसाय परवाना व व्यवसाय परवाना नुतनीकरण शुल्कापोटी वसुली केलेल्या रक्कमेचा अपहार प्रकरणी संबंधितांस निलंबित करुन अपहार प्रकरणी गुन्हा मागे घेण्याबाबत महानगरपालिका स्थायी समिती समोर अपिल दाखल केले. त्यानुसार स्थायी समितीने सहानुभूतीपूर्वक विचार करुन किरकोळ स्वरुपाची शास्ती लावून सेवेत रुजू करुन घेण्यास व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४८१ मधील तरतुदीनुसार संबंधितावरील गुन्हा मागे घेण्याची मान्यता देते असा ठराव क्र.५५ दि.२६.१०.२०२० संमत केलेला आहे.

२. श्री.बालाजी देवराव देसाई यांना व्यवसाय परवाना व व्यवसाय परवाना नुतनीकरण शुल्कापोटी वसुल केलेल्या रक्कमेचा अपहार प्रकरणी दिनांक २१.८.२०१९ च्या आदेशान्वये निलंबित करुन श्री.देसाई यांच्यावर दिनांक ६.३.२०२० अन्वये ज्ञापन व जोडपत्र १ ते ४ बजावण्यात आले. सदर दोषारोप अमान्य केल्यामुळे श्री.देसाई यांच्याविरुध्द विभागीय चौकशी प्रस्तावित करण्यात आली. विभागीय चौकशी अहवालानुसार दोषारोप क्र.१ व २ सिध्द झालेला आहे. तद्अनुषंगाने, श्री.देसाई यांच्यावर भा.द.वि.कलम ४०९ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

३. निलंबनाबाबत शासन निर्णय दिनांक १४.१०.२०११ मधील तरतूदीनुसार निलंबन आढावा समितीसमोर प्रकरण ठेवून समितीच्या शिफारशीनुसार कार्यवाही करण्यात येईल असा अहवाल महानगरपालिकेने प्रशासकीय टिप्पणीन्वये सादर केला होता. निलंबन आढावा समितीने केलेल्या शिफारशीनुसार श्री.देसाई यांना आर्थिक व्यवहाराचे कोणतेही काम न देता स्वच्छता विभागात स्वच्छता निरीक्षक या पदावर दिनांक २८.१२.२०२० च्या आदेशान्वये महानगरपालिकेने पुन:स्थापित केले आहे.

४. तथापि, श्री.बालाजी देवराव देसाई,स्वच्छता निरीक्षक यांची नियुक्ती झाल्यापासूनच्या कालावधी मध्ये दैनंदिन कामाच्या व्यापामुळे अनावधानाने पहिलीच चुक झाली असून अपहारीत रक्कम कार्यालयात भरणादेखील केलेली आहे. त्यामुळे श्री.देसाई यांनी केलेल्या अपिलावर सहानुभूतीपूर्वक विचार करुन किरकोळ स्वरुपाची शास्ती लावून सेवेत घेण्याबाबत तसेच श्री.देसाई यांच्याविरुध्द दाखल करण्यात आलेला गुन्हा मागे घेण्याबाबत स्थायी समितीने ठराव क्र.५५ दि.२६.१०.२०२० संमत केलेला आहे.

५. उपरोक्त ठराव हा अधिनियमातील तरतूदींशी विसंगत तसेच महानगरपालिकेच्या आर्थिक हिताचा नसल्यामुळे सदर ठराव महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (१) मधील तरतूदीनुसार विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी केली आहे.

६. श्री.बालाजी देवराव देसाई, स्वच्छता निरीक्षक यांनी व्यवसाय परवाना व व्यवसाय परवाना नुतनीकरण शुल्कापोटी वसुली केलेल्या शासकीय रकमेचा अपहार केला आहे. श्री.बालाजी देवराव देसाई यांची सदरहू कृती ही कार्यालयीन कामकाजाच्या विरुध्द आहे. तसेच त्यांच्यावरील ठेवण्यात आलेले दोषारोप क्र.१ व २ ही सिध्द झालेले आहेत. त्यामुळे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र.५५ दि.२६.१०.२०२० विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी दिनांक ०३.०३.२०२१ च्या पत्रान्वये केलेली आहे.

उपरोक्त नमूद बाबीं विचारात घेऊन महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र.५५ दि.२६.१०.२०२० हा निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकाचा स्थायी समितीचा ठराव क्र.५५, दि.२६.१०.२०२० हा प्रशासकीय टिप्पणीच्या विरुध्द आहे. त्यामुळे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) नुसार विखंडित करण्यासाठी प्रथमत: निलंबित करण्यात येत आहे.

सदर ठराव निलंबनाप्रकरणी संबंधितांना अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांनी निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत शासनास अभिवेदन करणे आवश्यक आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०१३११३२५११९८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.01.31 13:38:23 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
२. नगर सचिव तथा प्राधिकृत अधिकारी, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका,नांदेड
३. प्रधान सचिव, (नवि-२), यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग,मंत्रालय
४. उपसचिव (नवि-२४), यांचे स्वीय सहाय्यक,नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. निवड नस्ती (नवि-२४).